महिला व बाल विकास विभागाकडून सामाजिक न्याय विभागाकडे हस्तांतरीत झालेल्या अनुदानित मतीमंद बालगृह सलंग्नीत अपंग शाळा/कर्मशाळेसाठी पदे मंजूर करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय, व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक ईडीडी २०१२/प्र.क्र.२७६/अ.क.१**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २२ जून, २०१५

वाचा : १) महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्र.बालगृह २०११/प्र.क्र.३३८/कार्यासन-८, दि.३१.५.२०१२ व दि.१०.५.२०१३.
२) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्र. इडीडी २००३/प्र.क्र.३४०/भाग-२/सुधार-२,दि.१८.८.२००४ व दि.३०.१.२००६.
३) आयुक्तालयाचे पत्र क्र. अकआ/प्र-४-मति/मति.बालगृह/पदनिर्मिती प्रस्ताव/ २०१३-१४/५०, दि.५.२.२०१४.
४) आयुक्तालयाचे पत्र क्र. अकआ/प्र-४-मति/मति.बालगृह/कर्मचारी वर्ग/२०१४-१५/२४०, दि.१०.२.२०१५.
५) मा. मुंबई उच्च न्यायालय यांची जनहित याचिका क्र.१८२/२०१०.
६) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.इडीडी २०१३/प्र.क्र.२७६/ अक-१,दि.३०.१.२०१४.

प्रस्तावना :

बाल हक्क (मुलांचे सरंक्षण व काळजी) अधिनियम, २००० व सुधारीत नियम २००६ ची अंमलबजावणी महिला व बाल विकास विभागांतर्गत करण्यात येते. या विभागांतर्गत मतिमंद मुलांसाठी बालगृहे महिला व बाल विकास विभागाच्या नियंत्रणाखाली कार्यरत होती. परंतु महिला व बाल विकास विभागाच्या नियंत्रणाखालील बालगृहास विशेष प्रशिक्षित तज्ञ उपलब्ध नसल्यामुळे व राज्य शासनाच्या कार्यनियमावलीनुसार मतिमंद व्यक्तींबाबतच्या समस्या हा विषय अपंग व्यक्ती (समान संधी हक्कांचे संरक्षण व समान सहभाग) अधिनियम १९९५ अन्वये सामाजिक न्याय विभागाकडे असल्याने तसेच भारतीय पुनर्वसन परिषद अधिनियम, १९९२ मधील नियमाप्रमाणे सद्य:स्थितीत प्रशिक्षित कर्मचारी वर्ग सामाजिक न्याय विभागाच्या नियंत्रणाखालील मतिमंद मुलांच्या विशेष शाळा/ कर्मशाळेमध्ये असल्यामुळे त्यांच्या सेवेचा लाभ मतिमंद मुलांना व्हावा यादृष्टीने महिला व बाल विकास विभागाच्या नियंत्रणाखालील मतिमंद मुलांचीबालगृहे संदर्भीय दि.३०.५.२०१२ व दि.१०.५.२०१३ च्या शासन निर्णयाप्रमाणे या विभागाकडे हस्तांतरीत करण्यात आलेली आहेत.

या अनुषंगाने महिला व बाल विकास विभागाकडून हस्तांतरीत करण्यात आलेल्या अनुदानीत १४ मतिमंद बालगृहाकरीता सामाजिक न्याय विभागाच्या नियंत्रणाखालील अनुदानीत अपंगांच्या विशेष शाळा/ कर्मशाळा व संलग्नीत वसतीगृहासाठीच्या शासन निर्णय दि.१८.८.२००४ व दि.३०.१.२००६ च्या आकृतीबंधाप्रमाणे पदे मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :-

महिला व बाल विकास विभागाच्या नियंत्रणाखालील कार्यान्वीत असलेली मतिमंद बालगृहे येथील प्रवेशीतासह व मंजूर कर्मचा-यांसह या विभागाकडे हस्तांतरीत झालेली आहेत. सदर अनुदानीत १४ मतिमंद बालगृहांतील प्रवेशार्थीना अपंग व्यक्ती (समान संधी हक्कांचे संरक्षण व संपूर्ण सहभाग) अधिनियम १९९५ मधील तरतूदीप्रमाणे शिक्षण व प्रशिक्षणाची सुविधा उपलब्ध करुन देण्याबाबतचे निदेश मा.उच्च न्यायालय जनहित

याचिका क्र.१८२/२०१० या प्रकरणी दिले आहेत. त्या निदेशांच्या अनुषंगाने सदरहू १४ मतिमंद बालगृहे संलग्नीत अपंगांची (मतिमंदांची) विशेष शाळा/ कर्मशाळेसाठी उच्च स्तरीय सचिव समितीच्या दि.२०.४.२०१५ रोजी झालेल्या ९३ व्या बैठकीमध्ये मान्य विद्यार्थी संख्येनुसार ३९३ पदे मंजूर करण्यास मान्यता दिलेली आहे. त्यानुषंगाने सोबतच्या प्रपत्र-अ मध्ये नमूद केलेल्या १४ मतीमंद बालगृह सलंग्नीत अपंग शाळा/कर्मशाळेसाठी त्यांच्या नावासमोर नमूद केलेल्या मान्य विद्यार्थी संख्येनुसार शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचा-यांची पदे मंजूर करण्यात येत आहेत. सदरचा शासन निर्णय निर्गमित करण्याच्या दिनांकापासून कर्मचारी पदे व त्यावरील वेतन १०० टक्के, वेतन खर्चाच्या ८ टक्के मर्यादेत वेतनेत्तर अनुदान, इमारत भाडे सार्वजनिक बांधकाम विभागाच्या प्रमाणपत्राप्रमाणे मान्य क्षेत्रफळाच्या ७५ टक्के व परिपोषण दरमहा रु.९९०/- प्रति लाभार्थी १२ महिन्याकरीता या प्रमाणे खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून मंजूरी देण्यात येत येत आहे.

१) बाल हक्क (मुलांचे सरंक्षण व काळजी) अधिनियम, २००० व सुधारीत नियम २००६ अन्वये मतिमंद बालगृहे स्थापित झालेली असल्याने त्या बालगृहांना या कायद्याप्रमाणे आयुक्त, महिला व बाल विकास विभाग यांची नोंदणी प्रमाणपत्र घेणे व त्यांचे नुतनीकरण करणे बंधनकारक आहे. त्याचप्रमाणे अपंग व्यक्ती (समान संधी हक्कांचे संरक्षण व संपूर्ण सहभाग) अधिनियम १९९५ अन्वये सक्षम अधिकारी यांच्याकडून नोंदणी प्रमाणपत्र घेणे बंधनकारक आहे.

२) मतिमंद बालगृहांमध्ये प्रवेशीतांना बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम २००० व सुधारीत नियम २००६ अन्वये जिल्हा स्तरावर गठीत करण्यात आलेल्या बालकल्याण समितीने (सी डब्ल्यू सी) विहित केलेल्या प्रवेश प्रक्रियेनुसार प्रवेश देण्याची कार्यवाही करावी.

३) बाल कल्याण समितीपुढे उक्त कायद्याखाली १८ वर्षाच्या आतील मतीमंद मुले दाखल झाल्यानंतर बाल हक्क समितीने परिविक्षा अधिकारी यांच्यामार्फत ते अनाथ असल्याची खात्री करावी. अनाथ व सकृतदर्शनी मतीमंद असल्याची खात्री झाल्यानंतर त्यांची तात्पुरती व्यवस्था महिला व बाल विकास नियंत्रणाखालील इतर संस्थेमध्ये करावी. अशा अश्रीतांचे अपंग व्यक्ती (समान संधी हक्कांचे संरक्षण व संपूर्ण सहभाग) अधिनियम १९९५ अन्वये अपंगत्वाचे प्रमाणपत्र देण्याकरीता गठीत केलेल्या निकटतम तज्ञ वैद्यकिय मंडळाकडून अपंगत्वाचे प्रमाणपत्र प्राप्त करुन घ्यावे. मतीमंद असल्याचे तज्ञ वैद्यकिय मंडळाचे प्रमाणपत्र प्राप्त झाल्यानंतर संबंधीत जिल्हयातील मतीमंद बालगृहातील रिक्त जागांची माहिती घेऊन संबंधीत निकटतम मतिमंद बालगृहामध्ये संबंधीत आश्रीतांस प्रवेश देण्याबाबतची कार्यवाही करावी. त्याचप्रमाणे संबंधीत आश्रीतांस सामाजिक न्याय विभागाच्या नियंत्रणाखालील मतिमंदांच्या निवासी विशेष शाळा/ कर्मशाळांमध्ये जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद/ सहाय्यक आयुक्त, मुंबई शहर / उपनगर यांच्या समन्वयाने प्रवेश देणे संबंधीत संस्थेवर बंधनकारक राहील.

४) मतिमंद बालगृहांमध्ये बाल कल्याण समितीच्या आदेशाप्रमाणे प्रवेश दिल्यानंतर संस्था प्रमुखास बाल कल्याण समितीच्या पूर्व परवानगीशिवाय सदरहू आश्रीतांचा प्रवेश रद्द करणे, संस्थेतून मुक्त करणे अथवा एका संस्थेतून दुस-या संस्थेमध्ये हस्तांतरीत करता येणार नाही.

५) वय वर्षे १८ च्या खालील मतिमंद मुलांना मतिमंद बालगृहांमध्ये दाखल केल्यानंतर त्याचे शारिरीक वय १८ वर्षापेक्षा अधिक झाले असले तरीही त्याचे बौध्दीक वय वाढत नसल्यास ही मुले अनाथ मतिमंद आश्रीत असल्यामुळे त्यांची आजीवन किंवा पर्यायी सुविधा होईपर्यंतच्या कालावधीकरीता त्याच मतिमंद बालगृहामध्येच व्यवसथा करणे बंधनकारक राहील.

६) मतिमंद बालगृहामध्ये १८ वर्षाखालील, १८ वर्षावरील व अतितीव्र मतिमंदत्व असलेल्या अथवा बहुविकलांग असलेल्या मुलांचे स्वतंत्र विभाग करावेत, १८ वर्षाखालील मुलांना विशेष शिक्षणाची सुविधा उपलब्ध करुन द्यावी. १८ वर्षावरील मतिमंद प्रवेशीत आश्रितांना व्यवसायाभीमूख प्रशिक्षणाची

व्यवस्था करण्यात यावी. तसेच जे अतितीव्र व बहुविकलांग प्रवेशार्थी आहेत, त्यांचेसाठी विशेष सुश्रूषा व काळजी अशी तीन विभागात वर्गवारी करुन त्यांची स्वतंत्र निवास व्यवस्था ठेवावी.

७) सद्य:स्थितीत कार्यरत असेलेल्या मतिमंद बालगृहांतील प्रवेशीत आश्रितांचे वयोगट विचारात घेऊन मतिमंद बालगृह संलग्न शाळा व कर्मशाळेसाठी आवश्यक असणारी पदे या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात येत आहेत. तेव्हा ज्या मतिमंद बालगृहांना विशेष शाळेसाठीची पदे मंजूर करण्यात आलेली आहेत त्यांना वयाच्या १८ वर्षापर्यंत आश्रित ठेवावे व विशेष शिक्षणाची सुविधा उपलब्ध करुन दयावी. वयाची १८ वर्षे पूर्ण झाल्यानंतर ज्या मतिमंद बालगृहांमध्ये कर्मशाळेसाठीची पदे मंजूर झालेली आहेत व त्या ठिकाणी व्यवसाय प्रशिक्षणाची सुविधा उपलब्ध आहे अशा मतिमंद बालगृहामध्ये संबंधीत आश्रितांस बाल कल्याण समितीच्या संमतीने व त्यांच्या आदेशानुसार वर्ग करावे, ही पर्यायी व्यवस्था होईपर्यंत असे आश्रित त्याच बालगृहामध्येच राहतील.

८) ज्या मतिमंद बालगृहामध्ये मुले आणि मुली एकत्रित आहेत अशा मतिमंद बालगृहामध्ये मुला मुलींची निवास व्यवस्था स्वतंत्र करणे व मुलींच्या निवासी कक्षामध्ये महिला काळजी वाहकाची नियुक्ती करणे बंधनकारक राहील.

९) मतिमंद बालगृहाकरीता शिक्षण, व्यवसाय प्रशिक्षण तसेच सुश्रूषा व काळजीकरीता आवश्यक तो प्रशिक्षीत कर्मचारी, विशेष तज्ञ व सेवक वर्ग मानकाप्रमाणे ठेवणे मतिमंद बालगृह चालविणा-या संस्थेवर बंधनकारक राहील. आश्रितांची नियमित वैद्यकिय तपासणी करुन पुरविण्यात आलेल्या वैद्यकिय उपचाराचे अभिलेख ठेवणे संस्थेवर बंधनकारक राहील.

१०) मतिमंद बालगृहे बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम २००० व सुधारीत नियम २००६ व अपंग व्यक्ती (समान संधी, हक्कांचे संरक्षण आणि संपूर्ण सहभाग) अधिनियम, १९९५ या दोन्ही कायद्यांतर्गत कार्यान्वीत असल्याने राज्य स्तरावर आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे व आयुक्त, महिला व बाल विकास विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची तसेच जिल्हा स्तरावर संबंधीत जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद / सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण मुंबई शहर/ उपनगर व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांची सदरील बालगृहावरील नियंत्रणाबाबत संयुक्तीक जबाबदारी राहील.

११) मतीमंद बालगृहाचे मुल्यनिर्धारण संबंधीत जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद / सहाय्यक आयुक्त समाज कल्याण, मुंबई शहर/ उपनगर यांचेमार्फत प्रतिवर्षी संस्थेचे सनदी लेखापालांच्या लेखा परीक्षण अहवालाप्रमाणे व संस्थेने ठेवलेल्या अभिलेख्यावरुन करण्यात येईल.

१२) मतिमंद बालगृहामध्ये अपंगांच्या शाळा/ कार्यशाळां संहिता १९९७ व नोंदणी प्रमाणपत्रासाठीचे मानकाप्रमाणे सोयी सुविधा उपलब्ध करुन देणे संबंधीत संस्थेवर बंधनकारक राहील.

१३) संबंधीत बालगृहामध्ये कोणताही अनूचीत प्रकार घडल्यास अथवा कोणत्याही स्वरुपाची अनियमितता घडल्याचे निदर्शनास आल्यास संबंधीत संस्था व संस्थेचे सर्व पदाधिकारी यांना व्यक्तीगत व संयुक्तिकरित्या जबाबदार धरुन प्रचलित कायदयाप्रमाणे कारवाईस पात्र राहतील.

१४) सदर बालगृहास बालगृह संलग्न अपंगांची (मतीमंदाची) विशेष शाळा/ कर्मशाळा असे संबोधण्यात येईल.

१५) सदर बालगृहे बाराही महिने कार्यरत असल्याने उन्हांळी/ हिवाळी तसेच इतर सुट्टयामध्ये शिक्षकेत्तर कर्मचा-यांची जबाबदारी राहील तशीच ती शिक्षकांचीही राहील.

१६) बालगृहातील बालके ही पूर्णत: अनाथ असल्याने त्यांना बाराही महिन्याचे परिपोषण अनुदान वा वेतनेत्तर अनुदान अनुज्ञेय राहील.

१७) मतिमंद बालगृह संलग्नीत निवासी शाळा/ कर्मशाळा/अनिवासी शाळा यांना शासन निर्णय दि.३०.१.२०१४ नुसार विहीत करण्यात आलेल्या सर्व अटी व शर्ती लागू राहतील.

१८) प्रत्येक शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांनी मतिमंद बालगृह संलग्नीत निवासी शाळा/ कर्मशाळेच्या अन्यथा कर्मशाळेच्या मुख्यालयाच्या ठिकाणीच वास्तव्यास असणे आवश्यक आहे. तसेच वसतिगृह अधिक्षक गृहपाल यांनी वसतिगृहातच राहणे आवश्यक आहे. सुटी व्यतिरिक्त त्यांची अनुपस्थिती गैरहजेरी समजण्यात यावी. काळजीवाहक, मदतनीस, राखणदार/पहारेकरी यांची सुध्दा त्यांना नेमून दिलेल्या वेळापत्रकाखेरीज त्यांची अनुपस्थिती ही गैरहजेरी समजण्यात येईल. सदर गैरहजेरी कालावधीचे त्यांचे वेतन कपात करण्यात यावे.

१९) संस्थेने मतिमंद बालगृह संलग्न निवासी शाळा/ कर्मशाळेसाठी, कर्मशाळेसाठी आवश्यक असलेल्या सर्व भौतिक, शैक्षणिक व आवश्यक असलेल्या सोयी सुविधा पुरविणे बंधनकारक राहील. जी संस्था अशा प्रकारच्या भौतिक, शैक्षणिक, आवश्यक सोयी सुविधा पुरविणार नाही अशा संस्थेच्या अपंग निवासी शाळा/ कर्मशाळांना वेतन, वेतनेतर अनुदान व इमारत भाडे अनुज्ञेय असणार नाही. संबंधित संस्थेने सदरहू बाबींवरील खर्च स्वत: करावा. त्यासाठी शासन जबाबदार असणार नाही.

२०) सर्व मतिमंद बालगृह संलग्न निवासी शाळा/ कर्मशाळा यांनी शासनाच्या आरक्षणाच्या धोरणानुसार व अधिनियमानुसार शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची पदे भरणे बंधनकारक राहील. ज्या संस्था शासनाच्या आरक्षण धोरणाचे अथवा अधिनियमाचे पालन करणार नाहीत अशा संस्थांच्या निवासी शाळा /कर्मशाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे वेतन अदा केले जाणार नाही. शासनाच्या आरक्षण धोरणाविरुध्द अथवा अधिनियमाविरुध्द नियुक्त केलेल्या शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे वेतन अदा करण्याची जबाबदारी ही सर्वस्वी संबंधित संस्थेची राहिल.

२१) सदरहू मतिमंद बालगृहांनी संलग्न शाळा/ कर्मशाळेस विहित करण्यात आलेल्या अटी व शर्तींची पूर्तता केल्यास निधीची उपलब्धता विचारात घेऊन नियमित अनुदान मंजूर करण्यात येईल.

२२) मतिमंद बालगृहांशी संलग्न अपंगांच्या विशेष शाळा/कर्मशाळांना केंद्र सरकार, स्थानिक संस्थांकडून किंवा इतर माध्यमांकडून नियमित अनुदान मिळत आहे, असे निदर्शनास आल्यास अशा मतिमंद बालगृह संलग्न अपंग शाळा/कर्मशाळा राज्य शासनाचे अनुदान मिळण्यास अपात्र ठरतील.

२३) शासनाने अनुदान तत्वावर आणणेकरिता वेळोवेळी विहीत केलेल्या अटी व शर्ती आणि कार्यपध्दतीचे पालन झालेले नाही, असे आढळून आल्यास त्या संस्थेची मान्यता रद्द करण्यात येईल.

२४) अनुदानीत मतिमंद बालगृह संलग्न शाळा /कर्मशाळांना दि.१८.८.२००४ व दि.३०.१.२००६ च्या आकृतीबंधाप्रमाणे मान्य विद्यार्थी संख्येनुसार शिक्षक व शिक्षकेतर कर्मचा-यांची अनुज्ञेय असणारी पदे मंजूर करण्यात येत आहेत. त्यामुळे त्यांची शैक्षणिक अर्हता व वेतन श्रेणीचे स्वरुप हे दि.१८.८.२००४ व दि.३०.१.२००६ च्या शासन निर्णयातील तरतूदीप्रमाणेच राहील.

२५) सदर अनुदानीत मतिमंद बालगृह संलग्न शाळा /कर्मशाळांसाठी पदे मंजूर करण्यात आल्यामुळे वाढीव होणारा खर्च पुरक मागणीव्दारे तरतूद उपलब्ध झाल्यानंतर शासनाकडून वितरीत करण्यात येईल. तसेच त्यापुढील वर्षाचा खर्च त्या-त्या लेखाशिर्षाखालील त्या-त्या वर्षी उपलब्ध होणा-या तरतूदीतून भागविण्यात यावा.

२६) सर्व अनुदानीत मतिमंद बालगृह संलग्नीत निवासी शाळा/ कर्मशाळा व त्यातील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचा-यांना अपंग शाळा /कर्मशाळा संहितेप्रमाणे सर्व अटी व शर्ती लागू राहतील.

२७) आकृतीबंधाप्रमाणे मंजूर केलेल्या पदावर संस्थेने विहित कार्यपध्दतीनुसार शैक्षणिक अर्हता, मागासवर्गीयांकरीता उच्चत्तम वयोमर्यादा तसेच अपंगांचे आरक्षण याप्रमाणे शिक्षक /शिक्षकेत्तर

कर्मचा-यांची नियुक्ती केली असल्याची पडताळणी करुन जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद / सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण मुंबई शहर/ उपनगर यांनी नियमाप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्याची कार्यवाही करावी व त्यानुसार संबंधीत कर्मचारी देय वेतन अनुदानास पात्र राहतील.

३. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.९५/विसू-१, दि.१.४.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्राच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र.२०१५०६२२१२३५००३९२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh Vishwanath Durve

Digitally signed by Mahesh Vishwanath Durve
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Mahesh Vishwanath Durve
Date: 2015.06.26 13:58:48 +05'30'

( म. वि.दुर्वे )
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा) महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर
३) आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
५) सर्व प्रादेशिक उपायुक्त समाज कल्याण विभाग
६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८) सर्व संबंधीत समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद,
९) सहायक आयुक्त, समाजकल्याण, मुंबई शहर/ उपनगर
१०) सर्व जिल्हा महिला व बालविकास अधिकारी
११) सर्व संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी
१२) मा.मंत्री /राज्यमंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव
१३) मा.प्रधान सचिव (सा.न्या.) यांचे स्वीय सहाय्यक
१४) सर्व संबंधीत स्वयंसेवी संस्था
१५) निवडनस्ती, अ.क.-१.

प्रपत्र-अ

शासन निर्णय क्र.इडीडी २०१२/प्र.क्र.२७६/अक-१, दि.२२ जून, २०१५.

मतिमंद बालगृह संलग्न निवासी शाळा/कर्मशाळा यांना शाळा विभाग, कार्यालयीन विभाग, वसतीगृह विभाग याकरीता दि.१८.८.२००४ व दि.३०.१.२००६ या आकृतीबंधाप्रमाणे मंजूर पदे

| पदनाम व वेतनश्रेणी | दि चिल्ड्रेन एड सोसायटी संचलीत मेंटली डिफीसियंट चिल्ड्रेन होम (क/व) बालगृह, मानखुर्द, मुंबई (शाळा व कर्मशाळा) मा.वि.संख्या १५०+२०० | शासकीय मतीमंद मुलींचे (क/व) बालगृह शिरुर, जि.पुणे (सीएमसी सावंगी मेघे जिल्हा वर्धा संचलीत कार्मोलदया एज्युकेशन सोसायटी, शिरुर, जि.पुणे) मा.वि.संख्या ५० | शासकीय मतिमंद मुलांचे संमत केंद्र प्राजक्ता ४७४/१२६, लित परमप्रसार चॅरीटेबल सोसायटी सातारा संचलीत गणेश कॉलनी, जि.सातारा मा.वि.संख्या ५० | गोपाल शिक्षण संस्था संचलित स्वर्गवासी अंबादास पंत वैद्य मतीमंद मुकबधीर मुलामुलींचे बालगृह, वंझार फाटा, परतवाडा, जि.अमरावती मा.वि.संख्या ६० | मतिमंद युवक विकास व प्रशिक्षण संस्था मतिमंद बालगृह गोल्हार काचूरवाही, ता. रामटेक जि.नागपूर मा.वि. संख्या ५० |
|---|---|---|---|---|---|
| | १ | २ | ३ | ४ | ५ |
| मुख्याध्यापक (कनिष्ठ स्तर) ९३००-३४८०० ग्रेड पे ४३०० | १ | - | - | - | - |
| कार्यशाळा व्यवस्थापक/व्यवसाय अधिक्षक ९३००-३४८०० ग्रेड पे ४३०० | १ | - | - | १ | - |
| विशेष शिक्षक ५२००-२०२०० ग्रेड पे २८०० | १९ | ६ | ६ | - | ६ |
| कला/संगित/हस्तव्यवसाय/शारिरीक शिक्षक ५२००-२०२०० ग्रेड पे २८०० | ६ | २ | २ | - | २ |
| निदेशक ५२००-२०२०० ग्रेड पे २८०० | ८ | - | - | २ | - |
| निम वैद्यकिय कर्मचारी (भौतिक उपचार तज्ञ, मानस शास्त्रज्ञ, व्यवसायोपचार तज्ञ) ९३००-३४८०० ग्रेड पे ४३०० | ३ | १ | १ | - | १ |
| वैद्यकिय अधिकारी ९३००-३४८०० ग्रेड पे ४३०० अथवा ५४०० | १ | - | - | - | - |
| काळजीवाहक ४४४०-७४४० ग्रेड पे १३०० | १६<br>६+ (१०) | ५<br>२+ (३) | ५<br>२+ (३) | ४<br>०+ (४) | ५<br>२+ (३) |
| सफाईगार ४४४०-७४४० ग्रेड पे १३०० | १ | १ | १ | (१) | १ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| मानद वैद्यकीय अधिकारी (भौतिक उपचार तज्ञ, मानस शास्त्रज्ञ, व्यवसायोपचार तज्ञ) रु.१०,०००/- प्रतिमाह एकत्रित वेतन | - | १ | १ | | १ |
| लेखापाल ५२००-२०२०० ग्रेड पे २८०० | १ | - | - | | - |
| कनिष्ठ लिपिक नि लेखापाल ५२००-२०२०० ग्रेड पे १९०० | १ | १ | १ | १ | १ |
| अधिसेविका ५२००-२०२०० ग्रेड पे १९०० | १ | - | - | - | - |
| शिपाई ४४४०-७४४० ग्रेड पे १३०० | १ | १ | १ | १ | १ |
| गृहपाल ५२००-२०२०० ग्रेड पे १९०० | - | | | (१) | |
| वसतीगृह अधिक्षक ५२००-२०२०० ग्रेड पे १९०० | (१) | (१) | (१) | - | (१) |
| स्वयंपाकी ४४४०-७४४० ग्रेड पे १६०० | (२) | (२) | (२) | (२) | (२) |
| मदतनीस ४४४०-७४४० ग्रेड पे १३०० | ७<br>४ + (३) | (१) | (१) | (१) | (१) |
| पहारेकरी ४४४०-७४४० ग्रेड पे १३०० | (१) | (१) | (१) | - | (१) |
| परिचारीका ५२००-२०२०० ग्रेड पे २४०० | (३) | (१) | (१) | - | (१) |
| वाहनचालक दरमहा ३००० एकत्रित वेतन | (१) | (१) | (१) | (१) | (१) |
| वाहन परिचर दरमहा २००० एकत्रित वेतन | (१) | (१) | (१) | (१) | (१) |
| एकूण | ७६ | २६ | २६ | १६ | २६ |

- कंसातील आकडेवारी ही शाळा/ कर्मशाळेच्या वसतीगृह विभागासाठी मंजूर करण्यात आलेल्या पदांबाबतची आहे व उर्वरित आकडेवारी ही शाळा/ कर्मशाळा विभाग व कार्यालयीन विभागाकरीता मंजूर करण्यात आलेल्या पदाकरीता आहे.
- सफाईगार पद हे प्रत्येक अपंग शाळेसाठी ०१ पद मंजूर आहे. सदर पदे महिला व बाल विकास विभागाने मंजूर केलेली आहेत. त्यामुळे सदर पदावरील व्यक्ती सेवा निवृत्त होईपर्यंत हे पद अस्तित्वात राहिल. तद्नंतर या विभागाच्या दि.१८.०८.२००४ च्या आकृतिबंधानुसार प्रत्येक शाळेसाठी ०१ पद याप्रमाणे सदरिल पद कंत्राटीपध्दतीने भरण्यात येईल व मुळ वेतन अधिक देय महागाई भत्ता याच्या ५० टक्के एवढे एकत्रित वेतन सदर पदास देय राहिल.

Mahesh Vishwanath Durve

Digitally signed by Mahesh Vishwanath Durve
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Mahesh Vishwanath Durve
Date: 2015.06.26 13:59:07 +05'30'

(म. वि. दुर्वे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रपत्र-अ

शासन निर्णय क्र.इडीडी २०१२/प्र.क्र.२७६/अक-१, दि.२२ जून, २०१५.

मतिमंद बालगृह संलग्न निवासी शाळा/कर्मशाळा यांना कार्यालयीन विभाग, वसतीगृह विभाग या करीता दि.१८.८.२००४ व दि.३०.१.२००६ या आकृतीबंधाप्रमाणे मंजूर पदे

| पदनाम व वेतनश्रेणी | स्व.मुक्ताई क्रिडा शिक्षण व बहुउद्देशीय संस्था सोलापूर संचलीत मुक्ताई मतिमंद मुलांचे बालगृह लवंगी ता.मंगळवेढा, जि.सोलापूर मा.वि.संख्या५० | श्री हनुमान शिक्षण प्रसारक मंडळ, सोलापूर संचलीत मतिमंद मुलींचे बालगृह, सोलापूर, जि.सोलापूर मा.वि.संख्या ५० | महाराष्ट्र मारवाडी चॅरीटेबल फौंडेशन,जालना व्दारा संचलित श्री शंकरलाल मुंदडा मतिमंद मुलांचे बालगृह, जि.जालना मा.वि.संख्या २५ | नवोदय ग्रामीण नागरी विकास प्रतिष्ठाण व सांस्कृतिक मंडळ, पाथडी, अहमदनगर संचलीत मतिमंद बालगृह, पाथर्डी, जि.अहमदनगर मा.वि.संख्या ५० | यमुनाताई शैक्षणिक व सांस्कृतिक महिला मंडळ, धुळे संचलीत श्री संस्कार मतिमंद मुलींचे बालगृह, ता.जि.धुळे मा.वि.संख्या ५० |
|---|---|---|---|---|---|
| | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| मुख्याध्यापक (कनिष्ठ स्तर) ९३००-३४८०० ग्रेड पे ४३०० | - | - | - | - | - |
| कार्यशाळा व्यवस्थापक/व्यवसाय अधिक्षक ९३००-३४८०० ग्रेड पे ४३०० | - | - | - | - | - |
| विशेष शिक्षक ५२००-२०२०० ग्रेड पे २८०० | ६ | ६ | ३ | ६ | ६ |
| कला/संगित/हस्तव्यवसाय/शारिरीक शिक्षक ५२००-२०२०० ग्रेड पे २८०० | २ | २ | १ | २ | २ |
| निदेशक ५२००-२०२०० ग्रेड पे २८०० | - | - | - | - | - |
| निम वैद्यकिय कर्मचारी (भौतिक उपचार तज्ञ, मानस शास्त्रज्ञ, व्यवसायोपचार तज्ञ) ९३००-३४८०० ग्रेड पे ४३०० | १ | १ | - | १ | १ |
| वैद्यकिय अधिकारी ९३००-३४८०० ग्रेड पे ४३०० अथवा ५४०० | - | - | - | - | - |
| काळजीवाहक ४४४०-७४४० ग्रेड पे १३०० | ५ २+(३) | ५ २+(३) | २ १+(१) | ५ २+(३) | ५ २+(३) |
| सफाईगार ४४४०-७४४० ग्रेड पे १३०० | १ | १ | १ | १ | १ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| मानद वैद्यकीय अधिकारी (भौतिक उपचार तज्ञ, मानस शास्त्रज्ञ, व्यवसायोपचार तज्ञ) रु.१०,०००/- प्रतिमाह एकत्रित वेतन | १ | १ | १ | १ | १ |
| लेखापाल ५२००-२०२०० ग्रेड पे २८०० | - | - | - | - | - |
| कनिष्ठ लिपिक नि लेखापाल ५२००-२०२०० ग्रेड पे १९०० | १ | १ | - | १ | १ |
| अधिसेविका ५२००-२०२०० ग्रेड पे १९०० | - | - | - | - | - |
| शिपाई ४४४०-७४४० ग्रेड पे १३०० | १ | १ | १ | १ | १ |
| गृहपाल ५२००-२०२०० ग्रेड पे १९०० | - | - | - | - | - |
| वसतीगृह अधिक्षक ५२००-२०२०० ग्रेड पे १९०० | (१) | (१) | (१) | (१) | (१) |
| स्वयंपाकी ४४४०-७४४० ग्रेड पे १६०० | (२) | (२) | (१) | (२) | (२) |
| मदतनीस ४४४०-७४४० ग्रेड पे १३०० | (१) | (१) | - | (१) | (१) |
| पहारेकरी ४४४०-७४४० ग्रेड पे १३०० | (१) | (१) | (१) | (१) | (१) |
| परिचारीका ५२००-२०२०० ग्रेड पे २४०० | (१) | (१) | (१) | (१) | (१) |
| वाहनचालक दरमहा ३००० एकत्रित वेतन | (१) | (१) | (१) | (१) | (१) |
| वाहन परिचर दरमहा २००० एकत्रित वेतन | (१) | (१) | (१) | (१) | (१) |
| एकूण | २६ | २६ | १५ | २६ | २६ |

- कंसातील आकडेवारी ही शाळा/ कर्मशाळेच्या वसतीगृह विभागासाठी मंजूर करण्यात आलेल्या पदांबाबतची आहे व उर्वरित आकडेवारी ही शाळा/कर्मशाळा विभाग व कार्यालयीन विभागाकरीता मंजूर करण्यात आलेल्या पदाकरीता आहे.
- सफाईगार पद हे प्रत्येक अपंग शाळेसाठी ०१ पद मंजूर आहे. सदर पदे महिला व बाल विकास विभागाने मंजूर केलेली आहेत. त्यामुळे सदर पदावरील व्यक्ती सेवा निवृत्त होईपर्यंत हे पद अस्तित्वात राहिल. तद्नंतर या विभागाच्या दि.१८.०८.२००४ च्या आकृतिबंधानुसार प्रत्येक शाळेसाठी ०१ पद याप्रमाणे सदरिल पद कंत्राटीपध्दतीने भरण्यात येईल व मुळ वेतन अधिक देय महागाई भत्ता याच्या ५० टक्के एवढे एकत्रित वेतन सदर पदास देय राहिल.

Mahesh Vishwanath Durve

Digitally signed by Mahesh Vishwanath Durve
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Mahesh Vishwanath Durve
Date: 2015.06.26 13:59:24 +05'30'

( म. वि. दुर्वे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रपत्र-अ

शासन निर्णय क्र.इडीडी २०१२/प्र.क्र.२७६/अक-१, दि.२२ जून, २०१५.

मतिमंद बालगृह संलग्न निवासी शाळा/कर्मशाळा यांना कार्यालयीन विभाग, वसतीगृह विभाग याकरीता दि.१८.८.२००४ व दि.३०.१.२००६ या आकृतीबंधाप्रमाणे मंजूर पदे

| पदनाम व वेतनश्रेणी | कै.बापूसाहेब एन.झेड, मराठे विधायक संस्था, शिरपूर, जि.धुळे संचलीत मतिमंद मुलामुलींचे बालगृह, शिरपूर, जि.धुळे मा.वि.संख्या ५० | तुळजाई प्रतिष्ठाण बहुउद्देशीय संस्था, पानगांव, ता.कळंब, जि.उस्मानाबाद संचलीत स्वआधार मतिमंद मलींचे बालगृह, जि.उस्मानाबाद मा.वि.संख्या ५० | श्री गजानन बहुउद्देशीय संस्था, बोरी, ता.जि.बोरी संचलीत संत गाडगेबाबा मतिमंद बालगृह, लातूर, जि.लातूर मा.वि.संख्या ५० | ज्ञानदेव शिक्षण प्रसारक मंडळ, कदेर संचलीत तुळजाभवानी अपंग मतिमंद क/व बालगृह, कदेर, जि.उस्मानाबाद मा.वि.संख्या ५० |
|---|---|---|---|---|
| | ११ | १२ | १३ | १४ |
| मुख्याध्यापक (कनिष्ठ स्तर) ९३००-३४८०० ग्रेड पे ४३०० | - | - | - | - |
| कार्यशाळा व्यवस्थापक/व्यवसाय अधिक्षक ९३००-३४८०० ग्रेड पे ४३०० | - | - | - | - |
| विशेष शिक्षक ५२००-२०२०० ग्रेड पे २८०० | ६ | ६ | ६ | ६ |
| कला/संगित/हस्तव्यवसाय/शारिरीक शिक्षक ५२००-२०२०० ग्रेड पे २८०० | २ | २ | २ | २ |
| निदेशक ५२००-२०२०० ग्रेड पे २८०० | - | - | - | - |
| निम वैद्यकिय कर्मचारी (भौतिक उपचार तज्ञ, मानस शास्त्रज्ञ, व्यवसायोपचार तज्ञ) ९३००-३४८०० ग्रेड पे ४३०० | १ | १ | १ | १ |
| वैद्यकिय अधिकारी ९३००-३४८०० ग्रेड पे ४३०० अथवा ५४०० | - | - | - | - |
| काळजीवाहक ४४४०-७४४० ग्रेड पे १३०० | ५ २+(३) | ५ २+(३) | ५ २+(३) | ५ २+(३) |
| सफाईगार ४४४०-७४४० ग्रेड पे १३०० | १ | १ | १ | १ |
| मानद वैद्यकीय अधिकारी | १ | १ | १ | १ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| (भौतिक उपचार तज्ञ, मानस शास्त्रज्ञ, व्यवसायोपचार तज्ञ)<br>रु.१०,०००/- प्रतिमाह एकत्रित वेतन | | | | |
| लेखापाल<br>५२००-२०२०० ग्रेड पे २८०० | - | - | - | - |
| कनिष्ठ लिपिक नि लेखापाल<br>५२००-२०२०० ग्रेड पे १९०० | १ | १ | १ | १ |
| अधिसेविका<br>५२००-२०२०० ग्रेड पे १९०० | - | - | - | - |
| शिपाई<br>४४४०-७४४० ग्रेड पे १३०० | १ | १ | १ | १ |
| गृहपाल<br>५२००-२०२०० ग्रेड पे १९०० | - | - | - | - |
| वसतीगृह अधिक्षक<br>५२००-२०२०० ग्रेड पे १९०० | (१) | (१) | (१) | (१) |
| स्वयंपाकी<br>४४४०-७४४० ग्रेड पे १६०० | (२) | (२) | (२) | (२) |
| मदतनीस<br>४४४०-७४४० ग्रेड पे १३०० | (१) | (१) | (१) | (१) |
| पहारेकरी<br>४४४०-७४४० ग्रेड पे १३०० | (१) | (१) | (१) | (१) |
| परिचारीका<br>५२००-२०२०० ग्रेड पे २४०० | (१) | (१) | (१) | (१) |
| वाहनचालक<br>दरमहा ३००० एकत्रित वेतन | (१) | (१) | (१) | (१) |
| वाहन परिचर<br>दरमहा २००० एकत्रित वेतन | (१) | (१) | (१) | (१) |
| एकूण | २६ | २६ | २६ | २६ |

- कंसातील आकडेवारी ही शाळा/ कर्मशाळेच्या वसतीगृह विभागासाठी मंजूर करण्यात आलेल्या पदांबाबतची आहे व उर्वरित आकडेवारी ही शाळा /कर्मशाळा विभाग व कार्यालयीन विभागाकरीता मंजूर करण्यात आलेल्या पदाकरीता आहे.
- सफाईगार पद हे प्रत्येक अपंग शाळेसाठी ०१ पद मंजूर आहे. सदर पदे महिला व बाल विकास विभागाने मंजूर केलेली आहेत. त्यामुळे सदर पदावरील व्यक्ती सेवा निवृत्त होईपर्यंत हे पद अस्तित्वात राहिल. तद्नंतर या विभागाच्या दि.१८.०८.२००४ च्या आकृतिबंधानुसार प्रत्येक शाळेसाठी ०१ पद याप्रमाणे सदरिल पद कंत्राटीपध्दतीने भरण्यात येईल व मुळ वेतनअधिक देय महागाई भत्ता याच्या ५० टक्के एवढे एकत्रित वेतन सदर पदास देय राहिल.

Mahesh Vishwanath Durve

Digitally signed by Mahesh Vishwanath Durve
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Mahesh Vishwanath Durve
Date: 2015.06.26 13:59:44 +05'30'

( म. वि. दुर्वे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन